सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण कार्यक्रमाशी संबंधित निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: दिव्यांग-२०२१/प्र.क्र.४०/दि.क.२**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: ११ मार्च, २०२२

वाचा : १) दिव्यांग कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र : दिकआ / वित्त व नियोजन / आवश्यक तरतूदी / २०२१-२२ / ३६९७ / पुणे, दिनांक २७ मे, २०२१,
२) दिव्यांग कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र : दिकआ / लेखा व वित्त / तरतूद वाटप / २०२१-२२ / ५९० / पुणे, दिनांक ४ मार्च, २०२२,
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१ / प्र. क्र. ४८ / अर्थ-३, दिनांक ६ एप्रिल, २०२१,
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१ / प्र. क्र. ४८ / अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१,
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१ / प्र. क्र. ४८ / अर्थ-३, दिनांक ३ फेब्रुवारी, २०२२.

**ज्ञापन :**

वित्त विभागाच्या दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठी कार्यक्रम खर्चाकरीता खालील तक्त्यामध्ये अनुक्रमांक ६ ते १२ येथे दर्शविण्यात आलेल्या बाबींसाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ५० टक्के इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करून देण्यात आला असून दिनांक ३ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन परिपत्रकान्वये, अनुक्रमांक १ ते ५ येथील बाबींसाठी आणखी ३५ टक्के निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे.

२. आयुक्त,दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या दिनांक २७ मे, २०२१ व दिनांक ४ मार्च, २०२२ च्या पत्रांस अनुसरुन दिव्यांग कल्याण आयुक्तालयांतर्गत राबविण्यात येणाऱ्या खालील योजनांकरीता निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच निधी वितरणाचे स्वतंत्र आदेश या विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनामार्फत निर्गमित करण्यात यावेत.

(रुपये हजारात)

| अ.क्र | लेखाशिर्ष तपशिल | अर्थसंकल्पीय तरतूद. | आयुक्तालयास खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबतची तरतूद. |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण ,१०१ अपंगांचे कल्याण (०८)(०७) ८ वी पर्यंतच्या शारीरीकदुष्टया दिव्यांग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्या व उद्योगातील प्रशिक्षण (कार्यक्रम) ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने. (२२३५२७४२ ) (स्थानिक). | २७७९३.०० | ९७२७.५५ |
| २ | (०८)(०९) ८ वी पर्यंतच्या शारीरीकदुष्टया दिव्यांग विद्यार्थ्यांनासाठी राज्य सरकारच्या शिष्यवृत्या (कार्यक्रम ) ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने. (२२३५२७६२) (स्थानिक). | २८५२३.०० | ९९८३.०५ |
| ३ | (०५) शारीरिकदृष्टया अपंगांसाठी इतर योजना (०५)(०८) ८ वी पर्यंतच्या शारीरीकदुष्टया दिव्यांग विद्यार्थ्यांनासाठी राज्य सरकारच्या शिष्यवृत्या (कार्यक्रम ) ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने. (२२३५०९२८). | १४८१.०० | ५१८.३५ |
| ४ | (०५)(०८) ८ वी पर्यंतच्या शारीरीकदुष्टया दिव्यांग विद्यार्थ्यांनासाठी राज्य सरकारच्या शिष्यवृत्या (कार्यक्रम ) ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने. (२२३५०९८२). | १०४४.०० | ३६५.४० |
| ५ | २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण , १०१ अपंगांचे कल्याण (०८) जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (०८)(०६) १० वी नंतरच्या शारीरीकदुष्टया दिव्यांगांना शिष्यवृत्या व उद्योगातील प्रशिक्षण (कार्यक्रम) ३४, शिष्यवृत्या / विद्यावेतने. (२२३५२७३३). | ७४८१०.०० | २६१८३.५० |

| अ.क्र | लेखाशिर्ष तपशिल | अर्थसंकल्पीय तरतूद. | आयुक्तालयास खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबतची तरतूद. |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ६. | (०१) (०२) अंधासाठी कार्य करणाऱ्या अशासकीय संस्थांना वित्तीय सहाय्य (कोषागारातून देय) (२२३५ ०७६८) ३१-सहायक अनुदान (वेतन्नेतर) | १७२००.०० | ८६००.०० |
| ७. | (०२) (०३) मुकबधीरांसाठी कार्य करणाऱ्या अशासकीय संस्थांना वित्तीय सहाय्य (कोषागारातून देय) (२२३५ ०८०१) ३१-सहायक अनुदान (वेतन्नेतर) | ३९०९०.०० | १९५४५.०० |
| ८. | (०३) (०६) अस्थिविकलांग व्यक्तींसाठी कार्य करणाऱ्या अशासकीय संस्थांना वित्तीय सहाय्य (कोषागारातून देय) (२२३५ ०८६६) (राज्यक्षेत्र) ३१-सहायक अनुदान (वेतन्नेतर) | ५७१०.०० | २८५५.०० |
| ९. | (०४) (०१) मनोविकलांग व्यक्तींसाठी कार्य करणाऱ्या अशासकीय संस्थांना वित्तीय सहाय्य (कोषागारातून देय) (२२३५ ०८९३) ३६-सहायक अनुदान (राज्यक्षेत्र) | ५८५९४.०० | २९२९७.०० |
| १०. | (०३) (०२) दिव्यांग व्यक्तींना कृत्रिम अवयव देणे (२२३५ ०८२१) ३१-सहायक अनुदान | ३१.०० | १५.५०० |
| ११. | (०३) (०२) दिव्यांग व्यक्तींना कृत्रिम अवयव देणे (२२३५ २७०६) ३१-सहायक अनुदान | १२८६००.०० | ६४३००.०० |
| १२. | (०५) (१२) राज्यातील दिव्यांगांचे सर्वेक्षण (कोषागारातुन देय) (२२३५ २२१४) ५०-इतर खर्च | १००००.०० | ५०००.०० |

३. अ) राज्यातील शारीरिक दृष्टया दिव्यांग व्यक्तींचे सर्वेक्षण (२२३५ २२१४) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेला निधी दिव्यांगांना युडीआयडी कार्ड वितरीत करण्यासाठी वापरण्यात यावा.

ब) शारिरीकदृष्टया दिव्यांग व्यक्तींना कृत्रिम अवयव इत्यादी देण्यासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ०८२१,२२३५ २७०६) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेला निधी समप्रमाणात

जिल्हाधिकाऱ्याच्या नियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्रामार्फत कृत्रिम अवयव वितरीत करण्यासाठी यावा.

४. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून राहतील.

५. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र माहे एप्रिल, २०२२ अखेरपर्यंत न चूकता शासनास सादर करण्यात यावे.

६. नियंत्रक अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशीर्षाकडे निधी वळता करता येणार नाही.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०३१११६५६१८७८२२ आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

RAJESH BHASKAR GAIKWAD

Digitally signed by RAJESH BHASKAR GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5b1378a498cdff3fdd9ea5370b71fae3eca97e85924d0e443758ade5f0221f9a, pseudonym=CE9EA9E188F4D4185D077369347C5FA9BB29293F, serialNumber=26E171EC96C63F6333217D12FB6DA1C5A800CE18A7A6FD59ABF19B8ED3F02A91, cn=RAJESH BHASKAR GAIKWAD
Date: 2022.03.11 16:58:06 +05'30'

**(रा. भा. गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
५. सर्व मा. संसद सदस्य आणि विधानपरिषद/विधानसभा सदस्य,
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
११.महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१२.महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,

१३.संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४.सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
१५.सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण,
१६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७. कोषागार अधिकारी, पुणे,
१८. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३/७, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
१९.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०.निवड नस्ती /दि.क.२.